**तंत्र शिक्षण संचालनालयांतर्गत कार्यरत अभियांत्रिकी, औषध निर्माण शास्त्र, वास्तु शास्त्र व इतर अ.भा.तं.शि. परिषदेकडून मान्यता देण्यात येणारे पदवी तथा पदविका अभ्यासक्रम राबविणा-या अशासकीय अनुदानीत संस्थात कार्यरत शिक्षकेतर पदांना, पाचव्या वेतन आयोगानुसार सुधारित वेतनश्रेणी लागू करणे.**

**महाराष्ट्र शासन**
उच्च व तंत्र शिक्षण विभाग,
शासन पुरकपत्रक क्रमांकः सवेआ २००९/(१४०/०९)/तांशि-२
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- ६ मे २०१०

संदर्भ :- १) शासन निर्णय क्र. डब्लूबीपी १२१३/ (३४)/तांशि -२, दिनांक १३.१०.९३
२) शासन निर्णय क्र. डब्लूबीपी १०९५/ २७९३/ २७२ व्यशि-५, दिनांक २१.९.९५
३) शासन निर्णय, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, क्रमांक टिईडी १०९९/(१६८/९९) तांशि-५ दि. २० ऑक्टोबर २०००
४) शासन शुध्दीपत्रक क्र टिईडी १८०१/(३४४/०१) तांशि-५, दि. २४ ऑक्टोबर २००५
५) शासन पुरक पत्र क्र.टिईडी १८०१/(३४४/०१)/तांशि-५, दि.२९/११/२००८
६) शासन निर्णय क्र.टिईडी १८०३/(८५१/०३)/तांशि-५, दि.२३/१०/२००८

**शासन पुरकपत्रक :-** तंत्र शिक्षण संचालयांतर्गत कार्यरत अशासकीय अनुदानित तंत्रनिकेतने, औषधनिर्माणशास्त्र संस्था, अभियांत्रिकी महाविद्यालये व तत्सम संस्था यातील शिक्षकेतर कर्मचा-यांना संदर्भ क्रमांक ३ येथील शासन निर्णयानुसार सुधारित वेतनश्रेणी मंजूर करण्यात आली होती. उक्त शासन निर्णयामध्ये ज्या पदांचा समावेश करण्यात आला नव्हता त्या पदांपैकी काही पदांचा समावेश वरील संदर्भ क्र.४ ते ६ येथे नमूद केलेल्या शासन शुध्दीपत्रकान्वये / शासन निर्णयान्वये करण्यात आला. उक्त समावेशनानंतरही काही पदांना सुधारीत वेतनश्रेणी मंजूर करण्याचे राहून गेल्याचे दिसून आल्यामुळे सदर पदांना दि. २०.१०.२००० च्या शासन निर्णयामध्ये समावेश करण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

संदर्भ क्र-'३ येथील शासन पुरक पत्रकाच्या प्रपत्रामध्ये अ.क्र. ११४ ते १२४ या पदांचा समावेश करण्यास मान्यता देण्यात आली आहे. आता खालील पदांचा समावेश क्र.१ येथील शासन निर्णयात अ.क्र.१२५ नंतर करण्यास या आदेशान्वये शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | पदनाम | चौथ्या वेतन आयोगाची वेतनश्रेणी | पाचव्या वेतन आयोगाची सुधारित वेतनश्रेणी |
|---|---|---|---|
| १२५ | रेफ्रोग्राफीक मशिन ऑपरेटर | ९७५ - १५४० | ३२०० - ४९०० |
| १२६ | आर्टिस्ट/ फोटोग्राफर | १४०० - २३०० | ४५०० - ७००० |
| १२७ | प्रयोगशाळा तंत्रज्ञ | १४०० - २३०० | ४००० - ६००० |

उपरोक्त नमूद तक्त्यातील पदांना पाचव्या वेतन आयोगाच्या वेतनश्रेण्या या पदांच्या निर्मितीच्या दिनांक तथा उपरोक्त संदर्भ - १ मधिल शासन निर्णयानुसार सुधारीत वेतन श्रेण्या लागू करण्याचा दिनांक या पैकी जो दिनांक नंतरचा असेल त्या दिनांकापासून लागू करण्यात याव्या.

या सुधारित वेतनश्रेण्यांमुळे होणारा अतिरिक्त खर्च शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचा-यांच्या वेतन व भत्ते या संबंधीचा खर्च ज्या लेखाशिर्षाखालील खर्ची घालण्यांत येतो त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची घालण्यांत यावा व त्या लेखांशिर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना सदर बाबीवरील खर्चासाठी अतिरिक्त निधी उपलब्ध करण्यासाठी आवश्यक कार्यवाही करावी.

हे आदेश वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक- ३३६ /सेवा-९, दिनांक २९.०४.२०१० अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यांत येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक क्र. २०१००५०७१७५४३५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

(कांतीलाल उमाप)
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. डॉ.बाबासाहेब आंबेडकर तंत्रशास्त्र विद्यापीठ, लोणेरे जि.रायगड
३. सर्व सहसंचालक, तंत्रशिक्षण प्रादेशिक कार्यालय, मुंबई, पुणे, नाशिक, औरंगाबाद, अमरावती व नागपूर
४. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखा व अनुज्ञेयता),(लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर.
५. सर्व, प्राचार्य, शासकीय अनुदानित तंत्रनिकेतने औषध निर्माणशास्त्र संस्था व अभियांत्रिकी महाविद्यालये,
६. अधिदान व लेखाअधिकारी, निवासी लेखाधिकरी. मुंबई
७. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
८. वित्त विभाग
९. तंत्र शिक्षणाशी निगडीत
१०. निवड नस्ती तांशि-२